आयएनएस विराट या युध्दनौकेचे वस्तुसंग्रहालयात आणि सर्व सुविधांयुक्त पर्यटन केंद्रामध्ये रूपांतरीत करणेबाबत.

# शासन निर्णय

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक.संकिर्ण ०९१८/६२६/प्र.क्र.३५/बंदरे-१,**

२ रा मजला, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २७ नोव्हेंबर, २०१८

**प्रस्तावना :**

आयएनएस विराट ही युध्दनौका दिनांक ६ मार्च, २०१७ रोजी भारतीय नौसेनेच्या सेवेतून सेवानिवृत्त झाली आहे. सद्यस्थितीत सदर युध्दनौका नौसेना गोदीमध्ये (Naval Dockyard) ठेवण्यात आली आहे. भारतीय नौसेनाचा संपन्न वारसा सर्व जनतेला माहिती व्हावा, शालेय/महाविद्यालयीन तरुणांमध्ये सागरी क्षेत्राबाबत आवड निर्माण व्हावी, सागरी प्रशिक्षण व त्याचबरोबर पर्यटनाच्या दृष्टीने सुविधा हया बाबी विचारात घेऊन, महाराष्ट्र शासनाने आयएनएस विराट ही युध्दनौका भारतीय नौसेनेकडून घेण्याचा आणि या युध्दनौकेचे वस्तुसंग्रहालयात व सर्व सुविधायुक्त पर्यटन केंद्रामध्ये रुपांतरीत करण्याची बाब विचाराधीन होती. त्यानुसार मंत्रीमंडळाच्या मान्यतेने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आलेले आहेत.

**शासन निर्णय :**

आयएनएस विराट या युध्दनौकेचे वस्तुसंग्रहालयात आणि सर्व सुविधांयुक्त पर्यटन केंद्रामध्ये रूपांतरीत करण्यास व सदर प्रकल्प सार्वजनिक-खाजगी-भागीदारी (Public-Private Partnership) तत्वावर राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर प्रकल्प राबविण्यासाठी मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे उच्चाधिकार समिती स्थापन करण्यास व समितीची कार्यकक्षा विहीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| मा.मुख्य सचिव | अध्यक्ष |
| अपर मुख्य सचिव (वित्त) | सदस्य |
| अपर मुख्य सचिव (नियोजन) | सदस्य |
| प्रधान सचिव (परिवहन व बंदरे) | सदस्य |
| प्रधान सचिव (पर्यटन) | सदस्य |
| मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड | सदस्य |
| उपसचिव (बंदरे) | सदस्य सचिव |

**३. समितीची कार्यकक्षा :-**

१) खाजगी उद्योजकाची निवड करण्यासाठी मागवावयाच्या निविदेच्या अटी व शर्ती ठरविणे

२) निविदांची तपासणी करुन विकासकांची निवड करणे.

३) Viability Gap Funding देणे, प्रकल्पाचे कार्यचालन याबाबत निर्णय घेणे.

२. हा शासन निर्णय पर्यटन विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.३४/२०१८/पर्यटन, दिनांक ३१.१०.२०१८, नियोजन विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.२२६/नियोजन-१४६१, दिनांक ३१.१०.२०१८ व, वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.३५६/२०१८/व्यय-८, दिनांक ३१.१०.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२७१०३५०७५३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shaila Ravindra Mithbavkar

Digitally signed by Shaila Ravindra Mithbavkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8bb03c6d206c79568018ba9511400e3bd24537b79e0985b2d7a66c816ab002f9, cn=Shaila Ravindra Mithbavkar
Date: 2018.11.27 15:09:01 +05'30'

**( शैला मिठबावकर )**

**कार्यासन अधिकारी, गृह विभाग**

**प्रत:**

१. मा. राज्यपाल यांचे अपर मुख्य सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.राज्यमंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव
४. मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. प्रधान सचिव (पर्यटन), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. प्रधान सचिव (परिवहन व बंदरे), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई.
१०.उपसचिव (बंदरे), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११.निवड नस्ती बंदरे-१.